**कोणार्क फाऊंडेशनचे एस.ई.एस. दयाल आशा नाईट लॉ कॉलेज, उल्हासनगर या विधी महाविद्यालयाच्या मान्यता आदेशात दुरूस्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बदल-२०२३/प्र.क्र.७२/मशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ जुलै, २०२३.

संदर्भ : १. शासन निर्णय, क्रमांक: एनजीसी-२०२२/(५४/२२)/मशि-४, दिनांक ०१ सप्टेंबर, २०२२.
२. भारतीय विधिज्ञ परिषद यांचे परिपत्रक क्र. BCI:D:९७:२०१४ (LE: Circular No.२/२००१४), दिनांक ०३ फेब्रुवारी, २०१४

**शासन आदेश**

कोणार्क फाऊंडेशनचे एस.ई.एस. दयाल आशा नाईट लॉ कॉलेज, उल्हासनगर या नवीन विधी महाविद्यालयास संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर महाविद्यालयास शासन मान्यता प्राप्त झाल्यानंतर भारतीय विधिज्ञ परिषदेने सदर महाविद्यालयाची तपासणी केली. सदर तपासणीत भारतीय विधिज्ञ परिषदेने सदर महाविद्यालयाचे “रात्र सत्र” बदलुन “दिवस सत्र” करावे व महाविद्यालयातील नाईट शब्द वगळावा अशी मौखिक सूचना केली. भारतीय विधिज्ञ परिषदेच्या संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकात विधी महाविद्यालयाकरीता वर्ग चालविण्याचा कालावधी सकाळी ८.०० ते संध्याकाळी ७.०० असा नमूद करण्यात आलेला आहे.

सदर वस्तुस्थितीच्या अनुषंगाने कोणार्क फाऊंडेशनचे एस.ई.एस. दयाल आशा नाईट लॉ कॉलेज नेताजी रोड, बँक ऑफ बडोदा समोर, उल्हासनगर, जि. ठाणे या महाविद्यालयाचे “**रात्र सत्र” बदलुन “दिवस सत्र” करण्यास तसेच, सदर महाविद्यालयातील “नाईट” शब्द वगळण्याबाबत** शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०७१४१२५११७७००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by PRASHANT RAMRAO HOLKAR
Date: 2023.07.14 12:55:06 +05'30'

**( प्रशांत होळकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) विभागीय सहसंचालक, कोकण विभाग, पनवेल.
३) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
४) संबंधित संस्था (विद्यापीठामार्फत)
५) निवडनस्ती (मशि-४).